"स्ट्राईव्ह इंडिया एज्युकेशन फाऊंडेशन " या प्रायोजक मंडळाच्या “युनिर्व्हसल मॅनेजमेंट युनिर्व्हसिटी, कर्जत, रायगड” या प्रस्तावित स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठाचा प्रस्ताव तपासण्यासाठी छाननी समिती नियुक्त करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग
**शासन निर्णय क्रमांक: स्वअवि-२०१८/(२६७/१८)/विशि-४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग
मंत्रालय, मुंबई : ४०००३२.
तारीख : ११ जानेवारी, २०१९.

**प्रस्तावना :-**

शासनास प्राप्त होणाऱ्या स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठांच्या प्रस्तावांची छाननी करण्यासाठी शासनाने विहित केलेल्या मार्गदर्शक सूचना मधील परिच्छेद ६(१) नुसार छाननी करण्यासाठी दि.१० सप्टेंबर, २०१३ च्या शासन निर्णयान्वये छाननी समिती गठीत करण्याची तरतूद आहे. त्यानुसार स्ट्राईव्ह इंडिया एज्युकेशन फाऊंडेशन या प्रायोजक मंडळाच्या "युनिर्व्हसल मॅनेजमेंट युनिर्व्हसिटी, कर्जत, रायगड" या स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठाच्या प्रस्तावाची छाननी करण्यासाठी खालीलप्रमाणे छाननी समिती गठीत करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :**

| अ.क्र. | क्रमांक | सदस्याचे नाव व पदनाम | समितीतील स्थान |
|---|---|---|---|
| १ | (१) | सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग | पदसिद्ध अध्यक्ष |
| २ | (२) | प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग | सदस्य |
| | (३) | अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग | सदस्य |
| | (४) | अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल विभाग | सदस्य |
| ३ | शासनाचे नामनिर्देशित केलेला शक्यतो संबंधित विषयाच्या विद्यापीठाच्या कुलगुरु | | |
| | (१) | प्रा.डॉ.शशिकला वंजारी, कुलगुरु, एस.एन.डी.टी महिला. विद्यापीठ, मुंबई. | सदस्य |
| ४ | शासनाने नामनिर्देशित केलेले तीन विख्यात विद्वान, संशोधन किंवा तज्ञ व्यक्ती | | |
| | (१) | श्री.आर.एस.माळी, माजी कुलगुरु, उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव | सदस्य |
| | (२) | श्री.व्यंकटरमणी, माजी कुलसचिव, मुंबई विद्यापीठ, मुंबई | सदस्य |
| | (३) | श्री.मंगेश किनरे, वित्त तज्ञ(C.A.) | सदस्य |
| ५ | उच्च व तंत्र शिक्षण विभागातील उप सचिव या दर्जापेक्षा कमी दर्जा नसलेला अधिकारी | | |
| | (१) | सह सचिव/उप सचिव (विद्यापीठ शिक्षण), उच्च व तंत्र शिक्षण विभाग | सदस्य सचिव |
| ६ | प्रकल्पाशी संबंधित विषयातील सखोल ज्ञान व अनुभव असलेली तज्ञ व्यक्ती | | |
| | (१) | स्ट्राईव्ह इंडिया एज्युकेशनल फाऊंडेशन यांचा " युनिर्व्हसल मॅनेजमेंट युनिर्व्हसिटी, कर्जत, रायगड” या प्रस्तावित स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठाच्या प्रस्तावासाठी डॉ. देवानंद शिंदे, कुलगुरु शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर यांची नियुक्ती करण्यात येत आहे. | निमंत्रित सदस्य (मतदान अधिकार असणार नाही.) |

**समितीची कार्यकक्षा**

१. समितीने शासनास प्राप्त झालेल्या " युनिर्व्हसल मॅनेजमेंट युनिर्व्हसिटी, कर्जत, रायगड " या प्रस्तावांची तपासणी शासनाने निर्धारित केलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार करावी. शासनाने निर्गमित केलेल्या स्वयं अर्थसहाय्यित मार्गदर्शक सूचनांच्या परिच्छेद ५(२) व ६(३) मध्ये नमूद केलेल्या बाबींच्या अनुषंगाने तपासणी करावी.

२. समितीस मार्गदर्शक तत्वामधील परिच्छेद ६(४) मधील तरतूदीनुसार प्रायोजक मंडळाकडून अन्य माहिती मागविता येईल.

३. समितीस, सविस्तर प्रकल्प अहवालात उणीवा आढळल्यास त्याबाबत बदल सुचविता येतील आणि प्रायोजक मंडळाने विनिर्दिष्ट कालावधीत त्यावर विचार करुन त्यांचे अनुपालन करण्यासाठी, ते त्या मंडळास कळवता येतील.

४. समितीचा कार्यकाल हा शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून एक वर्षाचा राहील.

५. समितीतील निमंत्रित सदस्यास मतदानाचा अधिकार असणार नाही.

६. समितीच्या पदसिद्ध अध्यक्षांच्या समवेत बैठकीच्या दिनांकापासून दोन महिन्यात आपला अहवाल शासनास सादर करावा.

७. के.पी.एम.जी. च्या प्रतिनिधीनी प्रकल्प अहवालाची Summery Sheet तयार करावी.

८. समितीच्या पदसिद्ध सदस्यांव्यतिरिक्त इतर सदस्यांना शासनाने विहित केलेल्या प्रचलित नियमांनुसार भत्ता अनुज्ञेय राहील व तो मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०१११७३७५९१००८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्या त येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SIDDHARTH KHARAT

Digitally signed by SIDDHARTH KHARAT
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=6f8cb55012423727bece629d954713c1ec2962a9ca9b9096431
70e56321cfd24, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=22c1b7c1413e77554a8e64cbc60b74fb6471605c32acf8
b9b51b2b018fefdc0b, ou=H AND TED, o=GOVERNMENT OF
MAHARASHTRA, cn=SIDDHARTH KHARAT
Date: 2019.01.16 12:59:14 +05'30'

**( सिद्धार्थ खरात )**

सह सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. मा.मंत्री (उ व तं शि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई :-४०००३२.
२. मा.राज्यमंत्री (उ व तं शि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई :-४०००३२.
३. मा.अपर मुख्य सचिव(वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई :-४०००३२.
४. मा.अपर मुख्य सचिव(नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई :-४०००३२.
५. मा.अपर मुख्य सचिव(महसूल), महसूल विभाग, मंत्रालय, मुंबई :-४०००३२.
६. मा.अपर मुख्य सचिव (उ व तं शि), उच्च व तंत्र शिक्षण, मंत्रालय, मुंबई :-४०००३२.
७. प्रा.डॉ.शशिकला वंजारी, सदस्य छाननी समिती, कुलगुरु, एस.एन.डी.टी. महिला विद्यापीठ, मुंबई.
८. श्री.व्यंकटरमणी, सदस्य छाननी समिती, डी. १३०२, रुनवर्ल्ड सेंटर, गोवंडी स्टेशन रोड, देवनार, मुंबई-४०० ०८८.

९. श्री.मंगेश किनरे, वित्त तज्ञ(C.A), सदस्य छाननी समिती, प्लॉट नं.५, राजलक्ष्मी, दुसरा मजला, परमार्थनिकेतन जवळ, जनरल अरुणकुमार वैद्य मार्ग, पाचपाखाडी, ठाणे (प.).
१०.डॉ.आर.एस.माळी, सदस्य छाननी समिती, माजी कुलगुरु, उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव.
११.उप सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई:-४०००३२.
१२.डॉ.देवानंद शिंदे, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर, निमंत्रित सदस्य.
१३.महालेखापाल, (लेखा व परिक्षा-१)/(लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
१४.संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई.
१५.कक्ष अधिकारी (रोखशाखा), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१६.के.पी.एम.जी. प्रतिनिधी यांना माहितीस्तव
१७.निवडनस्ती.